**कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कला संस्थातील गौण बांधकामे व विद्युत बांधकामे यांना परवानगी मिळणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र.एडीआर-२००९/(१०३/०९)/तांशि-६
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक:- ३० सप्टेंबर, २००९.

**प्रस्तावना:-** कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कला संस्थातील गौण बांधकामे व विद्युत बांधकामे याकरिता रु. ४०.००लक्ष इतका निधी सन २००९-१० या आर्थिक वर्षात खर्ची घालण्याबाबत शासनाची परवानगी मिळणेबाबतचा प्रस्ताव कला संचालकांनी सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** कला संचालकांनी सादर केलेल्या कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कला संस्थातील गौण बांधकामे व विद्युत बांधकामे करण्यासाठी एकूण रु.४०.००लक्ष इतका निधी उपलब्ध नियतव्ययामधून मंजूर करण्यात आला आहे. रु. ३.३३ लक्ष इतका निधी लेखानुदानाद्वारे व उर्वरित रु. ३६.६७/-लक्ष इतका निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आला आहे. सदर निधी खाली दर्शविलेल्या प्रयोजनासाठी सन २००९-१० या चालू आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

| अ.क्र. | महाविद्यालय/संस्थेचे नाव | बांधकामाचा तपशील | बांधकामाचा खर्च |
|---|---|---|---|
| १. | सर ज.जी.कला महाविद्यालय, मुंबई | वाळवी प्रतिबंधक उपाय योजना | रु. ८४,३३६ |
| २. | सर ज. जी. कला महाविद्यालय, मुंबई | संरक्षक भिंतीवर काटेरी तार कुंपण करणे. | रु. ६,०३,४७२ |
| ३. | सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई | खिडक्यांना ग्रील बसविणे | रु. १२,०२,७९७ |
| ४. | सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई | आवारातील विद्युत दिव्याची दुरुस्ती व वायरिंग करणे | रु. ९९,६३२ |
| ५. | सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई | विद्यार्थ्यांसाठीच्या प्रसाधन गृहाची दुरुस्ती व फरशी बसविणे | रु. ९९,६९४ |
| ६. | सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई. | नुतनीकरण व सिलींग फॅन्स, टेबल फॅन्स बसविणे | रु १,५०,००० |
| ७. | सर ज.जी. कला मुलांचे वसतिगृह, बांद्रा, मुंबई | नुतनीकरण | रु. १२,१४,३७५ |

| | | | |
|---|---|---|---|
| ८. | सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई | जुनी वायरिंग बदलून नवीन करणे | रु. ५,००,००० |
| ९. | सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई | वाळवी प्रतिबंधक उपाय योजना | रु. १,२५,६९४ |
| | | एकूण | रु. ४०,००,००० |

२. सदरचा निधी त्याच प्रयोजनासाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षात खर्ची घालण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त निधी मागणी क्र. एच-६, "२२०५-कला व संस्कृती-१०१-ललित कला शिक्षण - स्वेच्छा अनुदानातून वित्तीय व्यवस्था केलेली गौण बांधकामे- (००)(०१) कला संचालक, मुंबई (२२०५ ०५११) २७, लहान बांधकामे" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग पाच , अनुक्रमांक १ परिच्छेद क्र. १३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्रशासकीय व वित्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय www.maharashtra.gov.in या संकेतस्थळी सांकेतांक क्रमांक २००९०९३०१५३७२२००१ वर उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(र. रा. दोरसटवार)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार कार्यालय, (संबंधित) (संचालकांमार्फत)
वित्त विभाग,
नियोजन विभाग, / सार्वजनिक बांधकाम विभाग/वरळी
अवर सचिव , (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
निवड नस्ती, ताशि-६.

D:\2009\G.R-ADR-[illegible].doc